सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि.पालघर, यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप
मुख्य लेखाशिर्ष-२४१५०३१२
(पहिला हप्ता वेतन /वेतनेतर)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२२/प्र.क्र. २१/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २५ एप्रिल, २०२२.

वाचा -

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दिनांक १७.०९.१९९३.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दिनांक १२.६.२००१.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३ /अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.

**प्रस्तावना -**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (०१) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना सहायक अनुदान - (०१) (०१) ठाणे जिल्ह्यातील कोसबाड हिल येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) ३६, सहायक अनुदाने ( वेतन) संकेतांक क्र.२४१५ ०३१२), (योजनेत्तर)(दत्तमत)( मागणी क्र. एल -३) अंतर्गत ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल यांना वेतनेतरसाठी रु. ८९०.०० हजार (रु.आठ लक्ष नव्वद हजार ) व वेतनासाठी रु.२९२१.०० हजार (रु. एकोणतीस लक्ष एकवीस हजार फक्त ) असे रु. ३८११.०० हजार (रुपये अडोतीस लक्ष अकरा हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे .सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी पहिला हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ नुसार सन २०२२-२३ या अर्थसंकल्पिय मंजूर अनुदानातून निधी वितरित करण्याच्या वित्त विभागाच्या सूचना आहेत. त्या अनुषंगाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता १५ % रक्कम रु. ४३८.१५ हजार (रुपये चार लक्ष अडोतीस हजार एकशे पन्नास फक्त ) इतके अनुदान, तसेच ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ७ % मर्यादेत रु. ६२.३० हजार ( रुपये बासष्ट हजार तीनशे फक्त ) इतके अनुदान पहिला हप्ता म्हणून ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि. पालघर यांना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण - ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०३१२) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा . तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना), हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४२५१७१४४१३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.04.26 10:27:16 +05'30'

(सुनिल हंजे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत-

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई (२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, जिल्हा पालघर
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जिल्हा पालघर.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, ग्राम विकास विभाग
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.